**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणाऱ्या कारागृह कर्मचारी व कैदी यांच्या प्रवासखर्चापोटी प्रवासभाड्याची रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१०१६/प्र.क्र.२५७/तुरुंग-२**
२ रा मजला, (मुख्य इमारत), मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०६ डिसेंबर, २०१६

वाचा

१) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, क्र. इ प्र./एसटी/ ढोबळ रक्कमा/२०१६/९४०४/ कक्ष-६, दि.३.१०.२०१६ चे पत्र.

प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणाऱ्या कर्मचारी व कैदी यांच्या प्रवासखर्चाची रक्कम कारागृह विभागाकडून महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यात येते. सदर प्रयोजनार्थ सन २०१५-१६ ते २०१६-१७ या कालावधीतील प्रवास भाड्याची थकीत रकमेवरील व्याजासह अंदाजे रुपये १,४९,६२,२६९/- इतकी रक्कम कारागृह विभागाने महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अद्याप देय असल्याचे अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कळविले आहे. सदर रक्कमेपैकी काही रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अहवालानुसार महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणाऱ्या कर्मचारी व कैदी यांच्या प्रवास खर्चाची सन २०१५-१६ ते २०१६-१७ या कालावधीतील प्रवास भाड्याची थकीत रकमेवरील व्याजासह अंदाजे रुपये १,४९,६२,२६९/- इतक्या रकमेपैकी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रुपये २५,००,०००/- ( रुपये पंचवीस लक्ष फक्त) इतक्या निधी पैकी ८०% निधी म्हणजे रु. २०,००,०००/- ( रुपये वीस लक्ष फक्त) इतकी रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यास या शासन निर्णयानुसार शासन मंजुरी देत आहे.

सदर खर्च मागणी क्र.बी-५, २०५६- तुरुंग (योजनेत्तर योजना) ००१ संचालक व प्रशासन (००) (०१) कारागृह महानिरीक्षणालय ५० इतर खर्च दत्तमत (२०५६ ००२६) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर रक्कम फक्त प्रवास भाड्यापोटी अदा करावयाची असून, त्यात थकीत रकमेवरील व्याजाचा समावेश असणार नाही. थकीत रकमेवरील व्याजाबाबत यथावकाश शासन स्तरावरुन निर्णय घेण्यात येईल. सदरची रक्कम आहरण व संवितरण करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. मुंबई

वित्तीय नियम, १९५९ मधील नियम-१४९, परिशिष्ट २२ मधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावेत.

वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग-एक, अनुक्रमांक-२७, नियम क्रमांक १४९ तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६च्या परिशिष्टात नमूद केलेल्या अटीस अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१६१२०६१५३९२९५२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2016.12.06 15:42:22 +05'30'

**( प्रभाकर संखे )**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. सर्व सन्माननिय विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. सर्व कारागृह उपमहानिरीक्षक,
६. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. महाव्यवस्थापक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई,
८. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१२.उप सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३.कार्यासन परिवहन-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५.वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६.निवड नस्ती, कार्यासन तुरुंग-२.